क्रमांक आरजीए १०९८/१३९६/प्र. क्र. ३२/९८
१८-अ

सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक- १६ डिसेंबर, १९९८

विषय:- एड्स जनजागरण कार्यशाळा सहभागी होणाऱ्या कर्मचाऱ्यांचा प्रशिक्षण काळ हा कर्तव्य कालावधी मानण्याबाबत...

ज्ञापन:-

मंत्रालयीन कर्मचारी संघटना, मुंबई यांच्या दिनांक २३ सप्टेंबर, १९९८ च्या पत्रास अनुसरून असे कळविण्याचे आदेश आहेत की मंत्रालयीन कर्मचारी संघटनेतर्फे मंत्रालयात ऑक्टोबर, १९९८ मध्ये आयोजण्यात आलेल्या एड्स जनजागरण कार्यशाळेत सहभागी झालेल्या कर्मचाऱ्यांचा संबंधित दिवसाचा प्रशिक्षण काळ हा कर्तव्य काळ म्हणून नियमित करण्यात यावा.

हे ज्ञापन वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक सीआर ९११/९८/सेवा-९ दिनांक २२/११/९८ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[ भि. रा. वाटवे. ]
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१] अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२] निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
३] सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग.
४] वित्त विभाग,
५] सरचिटणीस, मंत्रालयीन कर्मचारी संघटना एम-६ मंत्रालय, मुंबई.
६] निवड नस्ती. / १८-अ.